भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील
सहसंचालक (गट-अ) या पदावरील
तात्पुरती पदोन्नती...

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** आपना-०२२१/प्र.क्र.१२९/पापु-१५
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३० नोव्हेंबर, २०२१.

**शासन निर्णय:-**

मा. सर्वोच्च उच्च न्यायालयातील विशेष अनुमती याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून तसेच रिट याचिका स्टँप क्रमांक १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप क्र. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक २५/०५/२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार, रिट याचिकेत होणा-या निर्णयाच्या अधीन राहून, डॉ. पंचमलाल लक्ष्मण साळवे, उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना सहसंचालक (गट-अ) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. डॉ. साळवे यांना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महसुली विभाग वाटप करण्यात येत आहे. तसेच त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ६ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्याचे नाव व सध्याचे पदनाम | सध्याचे कार्यालय | पदोन्नतीचे पद | पदोन्नतीनंतर वाटप केलेला महसुली विभाग | सहसंचालक पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना केलेले कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | डॉ. पंचमलाल लक्ष्मण साळवे, उपसंचालक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, कोकण | सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | पुणे | सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे |

०२. सदर अधिकाऱ्याची सह संचालक पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे-

अ) सदर अधिका-याविरूध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही.

ब) वरील अधिकाऱ्याची सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

क) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्याला नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

०३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याला संबंधित कार्यालयाने तात्काळ कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्याने पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११३००९५३२२४७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, serialNumber=d90328c2fc4e73b881bcfea3bc5824fa462a2ec1e4ead4bfe3b4979112bdb493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2021.11.30 12:26:11 +05'30'

**(राजेंद्र गेंगजे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
१०. उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१२. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. संबधित अधिकारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (संचालनालयामार्फत).
१४. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालय प्रमुख/ विभाग प्रमुख.
१५. निवडनस्ती, कार्यासन पापु-१५.